**पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित**
**अर्थसंकल्पीय तरतूद सन २०१९-२०**
**मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने**
**भारित (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण**
**कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज**
**(अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.१०८/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २६ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९
२. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०१९/प्र.क्र.१०/सेवा-६, दि. ४ मे, २०१९
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९
४. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०१९/प्र.क्र.२०/सेवा-६, दि. ८ ऑगस्ट,२०१९
५. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/वित्त-१/भनिनि व्याय/सुअंप्र/६४७/२०१९-२०, दि. २० नोव्हेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

सन १९८२-८३ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे कार्यरत असलेल्या सर्व कर्मचारी / अधिकारी यांच्या भविष्य निर्वाह निधी पोटी प्राधिकरणाकडून प्राप्त होणारी वर्गणीची रक्कम / सांविधीक ठेव म्हणून लेखाशिर्ष-८३३६ नागरी ठेवी अंतर्गत शासनाकडे जमा करण्यात येते. शासनाकडे मार्च अखेर एकूण जमा असलेल्या रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या व्याज दराने प्रचलित पद्धतीने लेखाशिर्ष २०४९ १२६८ अंतर्गत व्याज देण्यात येते.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या ठेवीपोटी शासनाकडे मार्च, २०१९ अखेर एकूण रु.२८७,२२,८९,६९९/- इतका निधी जमा आहे. सदर रकमेवर

भविष्य निर्वाह निधीच्या प्रचलित व्याज दराने व्याजाची रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

आर्थिक वर्ष सन २०१९-२० मधील माहे एप्रिल, २०१९ ते सप्टेंबर, २०१९ या सहा महिन्यांकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचारी यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८) या लेखाशिर्षाखाली प्राधिकरणाला रु.११,४१,७३,५१६/- (अक्षरी रुपये अकरा कोटी एकेचाळीस लाख त्र्याहत्तर हजार पाचशे सोळा फक्त) इतकी व्याजाची रक्कम या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून होणारा खर्च हा पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करावयाचा असून हा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदान करण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८) या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी हा “८३३६-नागरी ठेवी, ८००-इतर ठेवी, (००) (०८) महाराष्ट्र पाणी पुरवठा व मलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६ ५०६७) ” या शिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने जमा करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९ / प्र.क्र.९२ / अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. सदर निधी भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाची रक्कम असून या निधीचे पुस्तकी समायोजन करण्यात येणार असल्याने या शासन परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटी तसेच परिशिष्टामधील इतर अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२६१४५९४७२९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2019.11.26 16:13:51 +05'30'

**चेतन निकम**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, सर्व
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
३. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
११. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. निवड नस्ती कार्यासन पापु-२३